येरवडा मध्यवर्ती कारागृहाच्या तटाच्या बाहेरील व आतील बाजूस सुरक्षिततेसाठी विद्युत दिवे बसविणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

शासन निर्णय, क्र. इआयजे-१०९२/१[२०४]/पीआरएस-२,
दिनांक :- ४ फेब्रुवारी, १९९३.

वाचा :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक बीएलडी/अंदाजपत्रक/१९९२-९३/कार्य-३, दि. १३.११.१९९२.

शासन निर्णय :- येरवडा मध्यवर्ती कारागृह हे अतिसुरक्षा कारागृह असून तेथे क्रूर प्रवृत्तीचे खतरनाक टोळीवाले व अंमली पदार्थांचे व्यवसायी इ. प्रकारचे कैदी ठेवले जातात. त्यासाठी सदर कारागृहाची सुरक्षितता मजबूत असणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने सदर कारागृहाच्या मुख्य तटाच्या बाहेरील व आतील बाजूस प्रखर प्रकाशाचे विद्युत दिवे लावण्यासाठी येणारा अंदाजित खर्च रु. ७,९६,९५०/- [रुपये सात लाख शहाण्णव हजार नउशे पन्नास फक्त] इतक्या खर्चास शासन या आदेशाद्वारे खालील अटींवर प्रशासकीय मान्यता देत आहे.

१] नियोजन विभागाने वेळोवेळी लावलेल्या कपातीनंतरच्या उर्वरित तरतूदीमध्ये यावरील खर्च भागविणे बंधनकारक राहील.

२] अर्थसंकल्पात योग्य ती तरतूद केल्याखेरीज सदर कामास सुरवात करु नये.

२. यासाठी होणारा खर्च "४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१-कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-तुरुंग" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग, वित्त विभागाच्या सहमतीने अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्र. ४६९/इमा-२, दि.७.१२.९२, क्र. ३३७/यो-१०, दि. १७.१२.९२ व क्र. सीआर-१५/९३/व्यय-८, दि. ७.१.१९९३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ.ल.पाटील

[ अ. ल. पाटील ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

....२/-

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

कारागृह उपमहानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह, पुणे,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, [लेखा परीक्षा], मुंबई,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारत-२,

नियोजन विभाग, योजना-१०,

वित्त विभाग, व्यय-८,

निवड नस्ती.

—x—